सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता व्यवस्थापकीय अनुदान, ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) मंजूर करण्याबाबत.
वसंतराव नाईक विमुक्त जाती भटक्या जमाती विकास महामंडळ (मर्यादित)

**महाराष्ट्र शासन**
**विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-वनाम-२०१८/प्र.क्र.६०/महामंडळे**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक:- ३१.०८.२०१८**

**संदर्भ :-** १. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८

**शासन निर्णय :-**

वसंतराव नाईक विमुक्त जाती, भटक्या जमाती विकास महामंडळमार्फत सदर प्रवर्गातील लोकांच्या आर्थिक उन्नतीसाठी विविध योजना राबविण्यात येतात. या महामंडळास सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता प्रशासनावरील खर्च भाग्विण्याकरीता ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) यासाठी रु. १४,५०,०००/- (अक्षरी रुपये चौदा लक्ष पन्नास हजार फक्त ) एवढी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे.

०२. वसंतराव नाईक विमुक्त जाती भटक्या जमाती विकास महामंडळ (मर्या.) या महामंडळास प्रशासनावरील खर्च भागविण्याकरीता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता अर्थसंकल्पीय तरतुदींपैकी संदर्भीय परिपत्रकानुसार एकूण मंजूर अनुदानाच्या ७० टक्के मर्यादेत एकूण रु. १०,१५,०००/- (अक्षरी रुपये दहा लक्ष पंधरा हजार फक्त) एवढे सहायक अनुदान खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.-

१. योजनेतर निधीतील खर्चासाठी शासनाने ठरविलेले निर्बंध काटेकोरपणे अंमलात आणावेत.
२. व्यवस्थापनावरील खर्च मर्यादित ठेवण्याच्या दृष्टीने कामकाजात सुसूत्रता आणावी.
३. विविध बाबींवर खर्च केलेल्या रकमांची तपशीलवार माहिती व त्यावर केलेला खर्च याची सविस्तर माहिती शासनास सादर करावी.
४. कार्यालयीन खर्चात काटकसर करावी.
५. महामंडळाने कर्जाच्या वसुलीचे प्रमाण प्रभावीपणे राबविण्यासाठी प्रयत्न करावेत.
६. सदर योजनेचा निधी उपयोगिता प्रमाणपत्रे तपासण्याच्या अधीन वितरीत करण्यात येत आहे.

०३. उपरोक्त निधीचा खर्च करतांना संबंधित अधिकाऱ्यांनी सर्वसाधारण वित्तीय नियम, योजनेच्या अटी व शर्ती, CVC मार्गदर्शक सूचना, CAG निरीक्षणे इ. अनुपालन करून निधीचा विनियोग करावा.

०४. संदर्भ क्र. १ येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रका सोबतच्या तपासणी सूचीमध्ये नमुद केल्यानुसार प्रत्येक अटींची पुर्तता महामंडळाकडून करण्यात यावी.

**०५.** वरील अनुदानाबाबत सह सचिव/ उप सचिव (अर्थसंकल्प), विमुक्त जाती भटक्या जामती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग विभाग, मंत्रालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी राहतील. सदर अनुदानाची रक्कम आहरित करण्यासाठी, अवर सचिव (रोखशाखा), आहरण व संवितरण अधिकारी, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग यांना घोषित करण्यात येत आहे. त्यांना सदर अनुदान म.को.नि.४४ मधील नमुन्यातील देयकान्वये वसंतराव नाईक विमुक्त जाती भटक्या जमाती विकास महामंडळ, मुंबई यांस संवितरीत करण्याचे अधिकार देण्यात येत आहेत.

**०६.** याबाबीवर खर्च मागणी क्र. झेडजी-३, (०२) विमुक्त जाती भटक्या जमाती विकास महामंडळाला अनुदान, (०२) (०१) विमुक्त जाती भटक्या जमाती विकास महामंडळ (अनिवार्य) २२२५ई८४८,३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखली खर्ची टाकून सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागवावा.

**०७.** हा शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९ /अर्थ-३, दि. ०२.०४.२०१८ अन्वये दिलेल्या अधिकारीतेत निर्गमित करण्यात येत आहे.

**०८.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८३११५५४४१९७२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=VJNT OBCS SBC Welfare Dept., postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067,
serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2018.08.31 15:56:43 +05'30'

**(भा. र. गावित)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, विमुक्त जाती, भटक्या जमाती संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. सह सचिव /उप सचिव (महामंडळे) , सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, कोकण भवन, नवी मुंबई
४. व्यवस्थापकीय संचालक, वसंतराव नाईक विमुक्त जाती भटक्या जमाती विकास महामंडळ, मुंबई
५. महालेखापाल (ले व अ) महाराष्ट्र -१ व २, मुंबई/नागपूर
६. महालेखापाल (ले.प.) महाराष्ट्र -१ व २, मुंबई/नागपूर
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / जिल्हा कोषागार अधिकारी मुंबई /ठाणे
८. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
९. अप्पर कोषागार अधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई
१०. वित्त विभाग (का- व्यय-१४/अर्थोपाय/अर्थसंकल्प-३/साउ) मंत्रालय, मुंबई
११.सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई
१२. अवर सचिव (रोखशाखा) विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. निवडनस्ती (महामंडळे) विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग,मंत्रालय, मुंबई